**केंद्र शासनाच्या महत्वाकांक्षी आकांक्षित जिल्हा कार्यक्रमाच्या धर्तीवर राज्यात आकांक्षित शहरे कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. आजिका २०२२/प्र.क्र.३३/का-१४१२,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. १३ एप्रिल, २०२३

**प्रस्तावना :-** राज्ये / केंद्रशासित प्रदेशांच्या मुख्य सचिव / प्रशासकांची परिषद दि. १६.०६.२०२२ ते दि. १७.०६.२०२२ या कालावधीत धर्मशाला, हिमाचल प्रदेश येथे संपन्न झाली. सदर परिषदेच्या कार्यक्रम पत्रिकेमध्ये (१)राष्ट्रीय शैक्षणिक धोरणांची अंमलबजावणी (२) नागरी प्रशासन (३) पीक वैविध्य आणि तेलबिया आणि कडधान्यांमध्ये स्वयंपूर्णता प्राप्त करणे या विषयांचा समावेश होता. सदर परिषदेमध्ये राज्यांना आकांक्षित शहरे कार्यक्रम राबविण्याच्या सूचना करण्यात आल्या होत्या. त्यादृष्टीने राज्यातील गावांचे शहरीकरण व त्यातून नव्याने उद्‌भवलेल्या समस्यांबाबत विविध यंत्रणांसोबत विचारविनिमय करण्यात आला. त्याअनुषंगाने नागरीकरण झालेल्या "ड" वर्ग महानगरपालिका, "ब" व "क" वर्ग नगरपरिषदा व नगरपंचायतीमधील शहरांचा समतोल, कालबध्द व सर्वसमावेशक विकास करण्याच्या दृष्टीने निवडक निर्देशकांच्या सातत्यपूर्ण संनियंत्रणाच्या माध्यमातून राज्यात आकांक्षित शहरे कार्यक्रम राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाच्या आकांक्षित जिल्हा कार्यक्रमाच्या धर्तीवर राज्यात राबवावयाच्या आकांक्षित शहरे कार्यक्रमाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने दि. २०.१२.२०२२ रोजी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील बैठक संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार नगर विकास विभागास त्यांचे अधिपत्याखालील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांतर्गत येणाऱ्या शहरांची यादी व निकषांची शिफारस सादर करण्याबाबत कळविण्यात आले होते.

२. राज्यात राबवावयाच्या आकांक्षित शहरे कार्यक्रमासाठी नगर विकास विभाग व आयुक्त, नगर परिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई यांनी केलेल्या शिफारशीनुसार एकूण ५७ महानगरपालिका /

नगरपरिषदा / नगर पंचायतींची निवड शासनाने केली असून त्यांची यादी शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये जोडली आहे. सदर निवडीसाठी खालील निकष वापरण्यात आले आहेत :-

| अ.क्र. | निकष |
|---|---|
| १ | दरडोई महसूल ( Own revenue per capita) |
| २ | पाणी पुरवठा (water supply LPCD) |
| ३ | पक्क्या घरांची टक्केवारी (% of pakka houses in PMAY) |
| ४ | अनु. जाती-जमाती लोकसंख्या टक्केवारी |
| ५ | GFC Star ranking |

सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी संनियंत्रण निर्देशक (Monitoring Indicators ) व त्यांचे भारांश (Weightage) अंतिम करण्याची कार्यवाही शासन स्तरावर विचाराधीन आहे.

३. सदर शासन निर्णय नगर विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०४१२१७१८०१७३१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Devara Rajagopal
Date: 2023.04.13 13:10:32 +05'30'

**(डॉ. राजगोपाल देवरा)**

**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
९. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) विभाग यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. सर्व मा. मंत्री महोदय यांचे खाजगी सचिव,

१२. सर्व मा. राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,

१३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,

१५. आयुक्त, नगर परिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई

१६. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), विधानभवन, मुंबई,

१७. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), विधानभवन, मुंबई,

१८. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई / औरंगाबाद / नागपूर,

१९. *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई / औरंगाबाद / नागपूर,

२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / औरंगाबाद / नागपूर,

२१. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,

२२. महासंचालक, माहिती जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

२३. सर्व विभागीय आयुक्त/ सर्व जिल्हाधिकारी,

२४. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,

२५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई

२६. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपरिषदा,

२७. सह सचिव (का-१४१२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

२८. सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

२९. निवडनस्ती, कार्यासन-१४१२, नियोजन विभाग, (*पत्राने)

**नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. आजिका २०२२/प्र.क्र.३३/का-१४१२, दि. १३ एप्रिल, २०२३ सोबतचे परिशिष्ट "अ"**

**आकांक्षित शहरे कार्यक्रमासाठी निवड केलेल्या महानगरपालिका / नगर परिषदा / नगर पंचायतीची यादी**

| **स्थानिक स्वराज्य संस्थेचा प्रकार** | **निवड केलेल्या स्थानिक स्वराज्य संस्था** | | |
|---|---|---|---|
| एकूण १८ 'ड' वर्ग महानगरपालिकांपैकी निवड केलेल्या महानगरपालिका ९ | १)अकोला | ४)सोलापूर | ७)नांदेड वाघाळा |
| | २)परभणी | ५)मालेगाव ((नाशिक) | ८)भिवंडी |
| | ३)लातूर | ६)जळगांव | ९)उल्हासनगर |
| एकूण ७४ 'ब' वर्ग नगरपरिषदांपैकी निवड केलेल्या नगरपरिषदा १२ | १)देगलूर | ५)गंगाखेड | ९)जिंतूर |
| | २)आर्वी | ६)माजलगांव | १०)पैठण |
| | ३)सेलू | ७)मनमाड | ११)मुर्तिजापूर |
| | ४)वसमतनगर | ८)सिल्लोड | १२)नांदूरा |
| एकूण १४१ 'क' वर्ग नगरपरिषदांपैकी निवड केलेल्या नगरपरिषदा १८ | १)औसा | ७)मानवत | १३)मुरुम |
| | २)किनवट | ८)तळोदा | १४)परतूर |
| | ३)गडचांदूर | ९)चांदूरबाजार | १५)मुखेड |
| | ४)लोहा | १०)पातूर | १६)इगतपुरी |
| | ५)नेर नबाबपूर | ११)बिलोली | १७)कन्हान-पिंपरी |
| | ६)मुदखेड | १२)नळदूर्ग | १८)पाथरी |
| एकूण १४८ नगरपंचायतींपैकी निवड केलेल्या नगरपंचायती १८ | १)मानोरा | ७)मंठा | १३)भामरागड |
| | २)मालेगांव-जहॉगिर | ८)भातकुली | १४)फुलुंब्री |
| | ३)अर्धापूर | ९)मोखाडा | १५) नशिराबाद |
| | ४)सडक-अर्जुनी | १०)पाली | १६)एटापल्ली |
| | ५)माहूर | ११)नायगांव | १७)बार्शीटाकळी |
| | ६)सिंदखेडा | १२)अंगार | १८)पालम |

************